**वन्य प्राण्यांपासून आदिवासी शेतक-यांच्या शेतीच्या संरक्षणासाठी सौर उर्जेवर आधारित तारांचे कुंपण (सोलर कुंपण) बांधण्याच्या योजनेस मान्यता देणे......**

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्र. विकेस-२००९ /प्र.क्र. १८८ /का.१७
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०१०.

**वाचा:-** १) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांक विविका-२००९/प्र.क्र.१०२९/का-१४१५ दिनांक ३-२-२०१०
२)शासन निर्णय,आदिवासी विकास विभाग क्रमांक विकेस २००९/प्र.क्र.८४/का-१७, दिनांक १०-२-२०१०

**प्रस्तावना :-** विदर्भातील आदिवासी शेतक-यांच्या शेतीचे वन्य प्राण्यांपासून संरक्षण करण्यासाठी सौर उर्जेवर आधारित तारांचे कुंपण (Erection of solar fencing) बांधण्याच्या योजनेसाठी आदिवासी विकास विभागाने दिनांक १०-२-२०१० च्या शासन निर्णयान्वये भारत सरकारच्या " विशेष केंद्रीय सहाय्य" या योजनेतून रु. २२५.०० लक्ष रक्कम उपलब्ध करुन दिली आहे.

सदर योजनेची रुपरेषा निश्चित करुन सदर योजनेस मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-** शासन याव्दारे "वन्य प्राण्यांपासून आदिवासी शेतक-यांच्या शेतीच्या संरक्षणासाठी सौर उर्जेवर आधारित तारांचे कुंपण बांधण्याच्या योजनेस खालील व जोडपत्रातील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देत आहे.

१) सदर योजना विदर्भातील गोंदिया, गडचिरोली, यवतमाळ, वर्धा, चंद्रपूर, अमरावती, भंडारा, नागपूर या जिल्हयात राबविण्यात यावी.
२) यासोबत जोडलेल्या जोडपत्रातील दिलेल्या योजनेच्या तपशीलाप्रमाणे योजनेची तांत्रिक व प्रशासनिक मान्यता घ्यावी. तसेच संस्थेची निवड जोडपत्रातील निर्देशाप्रमाणे करावी.
३) या योजनेत एकेका व्यक्तींचे विखुरलेल्या क्षेत्रावर सौर उर्जेवर आधारित तारांचे कुंपण न घेता आदिवासी शेतकरी समुहाचे सुमारे ५० एकर सलग क्षेत्रामध्ये सौर उर्जेवर आधारित तारांचे कुंपण करण्यात यावे.
४) वरीलप्रमाणे सलग क्षेत्राचे कुंपण करतांना त्यामध्ये २० टक्के शेतकरी गैर आदिवासी असल्यास त्यांचाही लाभार्थी म्हणून समावेश करण्यात यावा.

५) सौर उर्जा कुंपणआवश्यकतेनुसार ६-८ ओळीचे असावे.

६) सौर उर्जेसाठी वापरण्यात येणा-या बॅटरीचे आयुष्य किमान ५ वर्षाचे असणे आवश्यक आहे. कुंपणासाठी आदेश देतांना अशी अट ठेवण्यात यावी.

७) सोलर कुंपणाची दुरुस्ती व देखभालीची जबाबदारी दोन वर्षापर्यंत निवडलेल्या संस्थेची राहील.याबाबीचा समावेश योजनेत करण्यात यावा.

८) दोन वर्षानंतर कुंपणाची दुरुस्ती व देखभाल योग्य रित्या होण्यासाठी व कुंपण सुरक्षित ठेवण्यासाठी लाभार्थ्यांनी त्यांच्यामधून स्वयं सहाय्य गट स्थापित करुन Fencing ची राखरखाव, दुरुस्ती व देखभालीची जबाबदारी पार पाडावी.

९) आवश्यकता भासल्यास वन खात्याची तांत्रिक व प्रशासनिक मदत घ्यावी.

१०)जोड पत्रातील तरतूदीप्रमाणे कामाबाबत रक्कम अदा करावी तसेच कामाचे निरिक्षण दिलेल्या मापदंडाप्रमाणे क्षेत्रीय अधिका-यांनी करावे.

११) नाले, नदी आणि ओढयात व्यवस्थित कुंपण घालावे व शेतक-यांना आपल्या शेतात येण्या जाण्याकरिता एक किंवा एकापेक्षा जास्त दारांची गरज असल्यास त्याचा समावेश योजनेत करावा.

१२)योजनेत राबवावयाची कार्यपध्दत व बाबी जोडपत्रातील दिलेल्या निर्देशानुसार राहतील.

२. आदिवासी विकास विभागाने संदर्भांकित दिनांक १०-२-२०१० च्या शासन निर्णयान्वये "विशेष केंद्रीय सहाय्य" या योजनेखाली मंजूर केलेल्या निधीची रक्कम मागणी क्रमांक-टी-५ मुख्यलेखाशिर्ष २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-०२- अनुसूचित जमातीचे कल्याण-७९६ -जनजाती क्षेत्र उपयोजना- (०१) -जनजाती क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना- विशेष केंद्रीय सहाय्य योजना (०१) (४१) केंद्रीय सहाय्याची एकात्मिक योजना ( २२२५ ३५५६) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतननेतर ) या अर्थशिर्षाखाली सन २००९-१० च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून आहरित करण्यात यावी.

३. हा शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०९००४१३१८५१४३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( र. प्र. आटे )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक (५ प्रती )

आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था,पुणे

अवर सचिव, भारत सरकार, जनजातीय कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली

सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास, ( प्रत्येकी २ प्रती )

सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
महालेखापाल, (लेखा परिक्षा महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर-२
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र-१/२ मुंबई/नागपूर-२
सर्व जिल्हाकोषाधिकारी
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (आ.वि.) आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव
मा. प्रधान सचिव, आदिवासी विकास स्वीय सहाय्यक
सर्व सह सचिव,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व उप सचिव,,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व कक्ष अधिकारी,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
(१८) संगणक समन्वयक, आदिवासी विकास विभाग (का.६) मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (का.१७ ) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

**जोडपत्र -**

**शासन निर्णय, क्र-विकेंस-२००९/प्र.क्र.१८८/का.१७ दिनांक ३१ मार्च, २०१०.**

| | | |
|---|---|---|
| १ | **योजनेचे नांव** | नक्षलग्रस्त व विदर्भातील अनुसूचित जमातीच्या भूधारक शेतकऱ्यांच्या शेताचे वन्य प्राण्यांपासून संरक्षण करणेकरिता सौर उर्जेवर आधारित तारेचे कुंपण करणे |
| २ | **योजनेतील युनिट संख्या** | १७८.५६१८ रनिंग किलोमीटर सौर उर्जेवर आधारीत तारेचे कुंपण |

| अ. क. | अपर आयुक्त | प्रकल्प अधिकारी | मंजूर निधी (रु. लाखात ) |
|---|---|---|---|
| १ | **नागपूर** | गडचिरोली | ४०.०० |
| २ | | अहेरी | २५.०० |
| ३ | | भामरागड | २५.०० |
| ४ | | देवरी | ३०.०० |
| ५ | | चंद्रपूर | २०.०० |
| ६ | | चिमूर | २०.०० |
| ७ | | नागपूर | १०.०० |
| ८ | **अमरावती** | धारणी | २०.०० |
| ९ | | पांढरकवडा | २०.०० |
| १० | | किनवट | १५.०० |
| | **एकूण** | | **२२५.००** |

| | | |
|---|---|---|
| ३ | **योजनेसाठी येणा-या खर्चाचे अंदाजपत्रक** | सोलर कुंपण उभारणेकरिता प्रती रनींग किलोमिटर अंदाजित खर्च रु.१.२६ लक्ष प्रमाणे रु. २२५.०० लक्ष निधी प्रस्तावित आहे. प्रकल्प अधिकारी हे मेडाच्या तांत्रिक मार्गदर्शना खाली योजना राबवतील. मेडा अथवा M.S.S.I.D.C. किंवा D.G. S. & D. यांच्याशी केलेल्या दरकरारातील (रेट कॉन्ट्रॅक्ट) दरांच्या आधारावर अंदाजपत्रक तयार करावे व मेडांची तांत्रिक मान्यता घ्यावी. |
| ४ | **योजना राबविणारी यंत्रणा** | प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प व महाराष्ट्र ऊर्जा विकास प्राधिकरण (मेडा ) अथवा मेडा मार्फत प्राधिकृत करण्यात आलेली एजन्सी M.S.S.I.D.C तसेच D.G. S. & D. यांचे रेट कॉन्ट्रॅक्ट असलेली यंत्रणा. |
| ५ | **नियंत्रक अधिकारी** | अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर |

| | | |
|---|---|---|
| ६ | **योजनेचा उद्देश/हेतू** | अतिदुर्गम व डोंगराळ वन प्रदेशात राहणारे अल्पभूधारक आदिवासी शेतक-यांना खरीप व रब्बी हंगाम घेत असलेल्या पिकांची जंगली जनावरे मोठया प्रमाणावर नासधुस करतात. त्यामुळे आदिवासी शेतक-यांना इच्छा असूनही व शेतीसाठी पाणी उपलब्ध असूनही पीके घेता येत नाही. तसेच पीके घेतली तरी शेतक-यांच्या पदरात पीक पडत नाही. या जनावरांपासून शेतीचे होणारे नुकसान टाळण्याकरिता अल्पभूधारक आदिवासी शेतक-यांच्या जमिनी भोवती सौर उर्जेवर आधारित तारेचे कुंपण घालणे प्रस्तावित आहे. जेणेकरुन पिकांची होणारी नासधुस टळून शेतीचे उत्पन्न शेतक-यांच्या पदरात पडण्यास सहाय्य होईल. |
| ७ | **योजनेची कार्यपध्दती** | अपर आयुक्त आदिवासी विकास /प्रकल्प अधिकारी यांचेस्तरावरुन वन विभागाच्या व मेडाचे अधिका-यांच्या सहाय्याने प्रकल्प क्षेत्रातील जंगली जनावरांपासून बाधीत शेती क्षेत्र निश्चित करतील. सदरच्या सलग बाधीत क्षेत्रात येणा-या शेतक-यांची यादी तयार करतील व एकूण धारण क्षेत्रापैकी लाभार्थी निहाय तारकुंपण करावयाचे क्षेत्र निश्चित करतील. सदर क्षेत्रात तार कुंपण करण्याकरिता विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन अपर आयुक्त/प्रकल्प अधिकारी हे प्रत्यक्षात काम करणारी यंत्रणा निश्चित करतील. संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास हे मेडा यांच्या मदतीने स्थळनिहाय ( साईट स्पेसिफिक ) अंदाजपत्रक तयार करीत असतांना योजनेतील निरनिराळया बाबींबाबत मेडाकडून रेट कॉन्ट्रॅक्टवर मंजूर केलेल्या दरसूचीचा आधार घ्यावा. ज्या बाबींबाबत मेडाचा दर उपलब्ध नसेल तेव्हा स्थानिक बाजारभावा प्रमाणे दर घेण्यात यावेत. तयार केलेल्या अंदाजपत्रकास तांत्रिक मान्यता मेडा या संस्थेकडून घ्यावी. संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी तांत्रिक दृष्टया मंजूर योजनेस प्रशासकीय मान्यता घ्यावी. सदर निश्चित करावयाची यंत्रणा वर नमूद केले प्रमाणे महाराष्ट्र ऊर्जा विकास प्राधिकरण (मेडा) ने निश्चित केलेल्या दर करारातील किंवा M.S.S.I.D.C तसेच D.G. S. & D. च्या दर करारातील उत्पादक एजन्सी असावी. कमी काळात अनेक कामे करुन घ्यावयाची असल्यास व त्यासाठी कालमर्यादा असल्यास व एका संस्थेकडून त्या कालमर्यादेत काम करणे शक्य नसल्यास रेट कॉन्ट्रॅक्टच्या यादीतील इतरही संस्थांना कामे द्यावीत. यंत्रणा निश्चित झाल्यानंतर अपर आयुक्त/प्रकल्प अधिकारी यंत्रणेस कार्यारंभ आदेश देतील. |

| | | |
|---|---|---|
| | | त्याप्रमाणे होणा-या कामाचा प्रगती अहवाल अपर आयुक्त, आदिवासी विकास हे दरमहा, आयुक्त आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांना सादर करतील. योजना पूर्ण झाल्यानंतर अपर आयुक्त फलनिष्पत्ती अहवाल आयुक्तालयास सादर करतील तसेच त्यासोबत उपयोगिता प्रमाणपत्र, खर्चाचा तपशील,लाभार्थी यांची शेतीचे क्षेत्र व कुंपणाच्या लांबीसह सादर करतील.<br>सदर योजनेचा निधी अप्पर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर हे महाराष्ट्र ऊर्जा विकास प्राधिकरण किंवा M.S.S.I.D.C किंवा D.G. S. & D. यांचे मंजूर दरकरारानुसार प्रती रॅनिग किलोमीटरप्रमाणे वितरित करतील. Solar Power Generating Equipment साठी स्वतंत्र दर राहील. |
| ८ | **योजनेचा कालावधी** | १ वर्ष (सन २००९-१०) |
| ९ | **योजनेच्या अटी व शर्ती** | १) लाभार्थी हा अनुसूचित जमातीचा भूधारक आदिवासी शेतकरी असावा.<br>२) कातकरी, कोलाम, माडीयागोंड या आदिम जमातीच्या शेतक-यांना प्रथम प्राधान्य द्यावे.<br>३) आदिवासी शेतक-यांच्या जमिनीला प्राधान्य द्यावे<br>४) लाभार्थ्यांची जमिन जंगली जनावरे यांच्या उपद्रवाने बाधीत सलग क्षेत्रातील असावी.<br>५) एकाच आदिवासी शेतक-यांची जमिन दोन वेगवेगळया ठिकाणी असल्यास दोन्ही ठिकाणी योजनेचा लाभ द्यावा.<br>६) योजनेच्या लक्षांकात तसेच कार्यपध्दतीत बदल करण्याचे अधिकार सचिव/प्रधान सचिव, आदिवासी विकास यांना असतील.<br>७) योजनेतंर्गत तयार केलेल्या तारकुंपणाची देखभाल करण्याची जबाबदारी लाभार्थ्यांचीच राहील.<br>८) लाभार्थ्यास तारकुंपण विकता येणार नाही व हस्तांतरित करता येणार नाही.<br>९) तार कुंपणाच्या यंत्रणेत बिघाड झाल्यास दुरुस्ती बाबतची सेवा स्थानिक पातळीवर उपलब्ध व्हावी या अनुषंगाने स्थानिक आदिवासी युवकास/लाभार्थ्यास प्रशिक्षित करण्याची जबाबदारी यंत्रणा कार्यान्वित करणा-या एजन्सींची राहील. त्यासाठी वेगळा निधी अनुज्ञेय राहणार नाही. |